**शासकीय जाहिरात वितरण धोरणाच्या अंमलबजावणीसाठी गठीत माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या स्तरावरील समितीमध्ये सुधारणा करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग,**

**शासन निर्णय क्र. मावज-२०२१/प्र.क्र.१२६/मावज-१**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- २२ एप्रिल, २०२४.

**वाचा :-** १) सा. प्र. वि. शासन निर्णय क्र. मावज-२०२१/प्र.क्र.१२६/मावज-१, दिनांक १३.८.२०२१

२) सा. प्र. वि. शासन आदेश क्र.मावज-२०२४/प्र.क्र.२२/मावज-२(३४-अ), दिनांक २६ मार्च २०२४

प्रस्तावना :-

उक्त संदर्भ क्र.१ येथील दिनांक १३.८.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्य शासनाची सर्व शासकीय/निमशासकीय कार्यालये, महामंडळे /मंडळे, प्राधिकरणे, आयोग इ. यांच्या जाहिराती वितरण करण्यासाठी एक धोरण निश्चित करण्यात आलेले आहे. या धोरणानुसार संबंधित शासकीय विभाग/निमशासकीय संस्था त्यांचा माध्यम आराखड्याचा प्रस्ताव माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडे पाठवतील. त्यानुसार सर्व शासकीय व निमशासकीय संस्थांच्या माध्यम आराखड्याचे नियोजन व अंमलबजावणी करण्यासाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयांतर्गत एक समिती उक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयाच्या परिच्छेद क्र.२ अन्वये गठीत करण्यात आलेली आहे. या समितीचे सदस्य सचिव म्हणून संचालक (माहिती)(प्रशासन) यांना नेमण्यात आलेले आहे.

२. उक्त संदर्भ क्र.२ येथील दिनांक २६ मार्च, २०२४ रोजीच्या शासन आदेशान्वये “माध्यम आराखडा” हा विषय आता संचालक (माहिती), मराठवाडा विभाग, छत्रपती संभाजीनगर यांच्याकडे सोपविण्यात आलेला आहे. या परिस्थितीत वरीलप्रमाणे गठीत समितीमध्ये उचित

बदल करणे आवश्यक आहे. त्यानुसार व समितीच्या रचनेमध्ये अन्य काही सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्याच्या सर्व शासकीय आणि निमशासकीय संस्थांसाठी माध्यम आराखड्याचे नियोजन व अंमलबजावणी करणे यासाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामध्ये उक्त संदर्भ क्र.१) येथील शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२ येथे नमूद समितीच्या रचनेमध्ये या शासन निर्णयान्वये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | पदनाम | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| १ | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई | सदस्य |
| ३ | संबंधित विभाग/कार्यालय यांचे विषयातील तज्ञ (मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील उपसचिव/ सहसचिव दर्जाचे अधिकारी, संबंधित कार्यालयाचे किमान उपसंचालक/उपायुक्त दर्जाचे अधिकारी ) | सदस्य/प्रतिनिधी |
| ४ | उपसंचालक (वृत्त) | सदस्य |
| ५ | उपसंचालक (प्रदर्शने) (बाह्य माध्यमे, पथनाट्य कलापथक, प्रिंट क्रिएटिव्ह, फ्लेक्स आणि बॅनर प्रिंटींग) | सदस्य |
| ६ | वरिष्ठ सहायक संचालक (वृत्तचित्र),(आकाशवाणी,दूरदर्शन,एफएम वाहिन्या,खाजगी टिव्ही वाहिन्या, सिनेमागृहे आदी DAVP माध्यमे) | सदस्य |
| ७ | वरिष्ठ सहायक संचालक (समाज माध्यम, न्यु मिडिया) | सदस्य |
| ८ | संचालक (माहिती)(मराठवाडा विभाग, छत्रपती संभाजी नगर) | सदस्य सचिव |

२. समितीच्या रचनेमध्ये करण्यात आलेल्या वरील सुधारणेव्यतिरिक्त उक्त संदर्भ क्र.१ येथील दिनांक १३.८.२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील अन्य सर्व बाबी कायम राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संकेतांक २०२४०४२२१६२२०११९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIJAY MAROTRAO NANDEKAR

Digitally signed by VIJAY MAROTRAO NANDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=1b335601da651693303a45db809973b127e2048acba707f3af981bf515548266, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=62861E2C588076DA807403FE9012F19FCC79CFD621047A784178829F75A0C6F2, cn=VIJAY MAROTRAO NANDEKAR
Date: 2024.04.22 16:34:49 +05'30'

**( वि. मा. नांदेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव
५. मा.मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
८. सर्व संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
९. सर्व विभागीय आयुक्त
१०.सर्व जिल्हाधिकारी
११.सर्व मंडळे/महामंडळे/स्थानिक स्वराज्य संस्था/शासनाच्या स्वायत्त संस्था
१२.प्रबंधक , उच्च न्यायालय, मुंबई/नागपूर
१३.लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१४. महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई, नागपूर,
१५.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१६.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१७.सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
१८. निवडनस्ती (मावज-१), सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई.